जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत लहान मच्छिमार बंदराचा विकास करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि ११२१/प्र.क्र.२४०/पदुम १४**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : २१ मार्च, २०२३

**संदर्भ -**

१) शासन निर्णय क्र. मत्स्यवि-२०१०/प्र. क्र. १९२/पदुम १४, दि. १८.०८.२०१०

२) महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळाचे पत्र क्र. ममविम/अभि/८१५/२०२३, दि. १७.०३.२०२१

**प्रस्तावना :**

राज्याच्या किनारी भागातील मासळी उतरविण्याच्या ठिकाणी मच्छिमारांना त्यांच्या मासेमारी नौकांनी पकडून आणलेली मासळी उतरविण्यासाठी, मासळी उतरविण्याच्या ठिकाणापासून मासळीचे वाहतूक करणे व मासळी उतरविण्याच्या ठिकाणी बोटीच्या ये-जा करण्याचा मार्ग सुकर होण्यासाठी एकूण ११ प्रकारच्या मुलभुत सुविधांची कामे हाती घेण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. उक्त ११ प्रकारच्या कामांसह मत्स्य संकलन केंद्र व तरंगता धक्का (जेट्टी) या कामांचा समावेश संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामध्ये करण्याबाबत तसेच महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळास अंमलबजावणी संस्था म्हणुन नियुक्त करण्याची विनंती व्यवस्थापकीय संचालक यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासनास केलेली आहे.

त्यानुषंगाने मत्स्य संकलन केंद्र व तरंगता धक्का (जेट्टी) या कामांचा समावेश जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत करण्याबाबत व महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळास अंमलबजावणी संस्था म्हणुन नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हा वार्षिक योजनेसंदर्भातील दि. १८.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयामध्ये करावयाच्या बदलांना शासन खालीलप्रमाणे मान्यता देत आहे.

२. संदर्भ क्र. १ येथील दि. १८.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयातील अ. क्र. १ येथे खालील २ कामे समाविष्ट करण्यात येत आहे -

१२) मत्स्य संकलन केंद्र

१३) तरंगता धक्का (जेट्टी)

३. संदर्भ क्र. १ येथील दि. १८.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयातील अ. क्र. ३ येथे नमूद -

सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी प्रस्तावित कामांचे सविस्तर नकाशे/अंदाजपत्रके पत्तन अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून प्राप्त करावीत

**याऐवजी**

सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी प्रस्तावित कामांचे सविस्तर नकाशे/अंदाजपत्रके पत्तन अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/**कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र मत्स्यद्योग विकास महामंडळ** यांचेकडून प्राप्त करावीत

यांस मान्यता देण्यात येत आहे.

४. संदर्भ क्र. १ येथील दि. १८.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयातील अ. क्र. ६ येथे नमूद -

लहान मासेमारी बंदराचा विकास करणे या योजनेकरिता कार्यान्वयन यंत्रणा पत्तन अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग राहील

याऐवजी

लहान मासेमारी बंदराचा विकास करणे या योजनेकरिता कार्यान्वयन यंत्रणा पत्तन अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग/**कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र मत्स्यद्योग विकास महामंडळ** राहील.

यांस मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११३०३४७३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY JAGANNATH SAVANE

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eecf658e3610fa137d1ea1fd3304d639f1d5384d08303b49875a1fb41cb9c5b8, pseudonym=BE10EB938AF079487419C9BFE07F030E4670A798, serialNumber=86F57086A2BEEC37477C2F6210FB8A27626CA243A845EA1A73F70CF31BE98102, cn=SANJAY JAGANNATH SAVANE
Date: 2023.03.21 13:08:33 +05'30'

**( सं. ज. सवने )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
८. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
९. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी/ उप कोषागार अधिकारी, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१३. सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१४. निवडनस्ती.